राज्य स्तरावरील युवा पुरस्कारासाठी निधी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्र :-निवियो-२०२४/प्र.क्र.९४/क्रीयुसे-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २९ मार्च, २०२५.

वाचा :-

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. युकयो-२०१२/प्र.क्र.६५/ क्रीयुसे-३, दि. १२.११.२०१३
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक,अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १२.०२.२०२५.
३) क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्रमांक निधी वितरण/युपुयो-५५६४/२०२४-२५/ का-१०/११०१, दि. २२.०७.२०२४.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १७ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :-**

राज्यातील व जिल्हयातील युवा व युवतींनी केलेल्या समाजहिताच्या कार्याचा गौरव व्हावा व युवांना विकासाचे कार्य करण्यासाठी प्रोत्साहन मिळावे यासाठी युवक, युवती व नोंदणीकृत संस्थाचा यथोचित गौरव करण्यासाठी जिल्हास्तरावर प्रतिवर्षी जिल्हा युवा पुरस्कार तर राज्यस्तरावर राज्य युवा पुरस्कार प्रदान करण्याबाबत संदर्भ क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. राज्य युवा पुरस्कार वितरीत करण्याकतीता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.१२५.०० लक्ष इतक्या मंजूर तरतुदीमधून रु. १८.०४ लक्ष (अक्षरी रूपये आठरा लक्ष चार हजार फक्त.) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** : -

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात राज्यातील युवा व युवतींना राज्य युवा पुरस्कार वितरीत करण्याकरीता अर्थसंकल्पित रु.१२५.०० लक्ष इतक्या मंजूर तरतुदीमधून रु. १८.०४ लक्ष (अक्षरी रूपये अठरा लक्ष चार हजार फक्त.) इतका निधी वितरीत करण्यास व सदर निधी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबी करीता होणारा खर्च “मागणी क्र. ३, २२०४ क्रीडा व युवक सेवा-१०३, (१०)(१०) युवा धोरणांतर्गत योजना, युवा पुरस्कार (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२०४ ५५६४)” या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी, लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५२/१४७१, दि. २०.०२.२०२५ व वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३५३/व्यय-५, दि. १०.०३.२०२५ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२९१५२५५७४३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA KETAN TONDE

Digitally signed by KAVITA KETAN TONDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=School Education Department,
2.5.4.20=d9d6cb2ca7858ab2922f2f069c1dcf0c59dbd6f04e8ac435f94b342b3c624ecc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=a738d4711deb1f586dd1811780ba863704a1ea496ff9ec7d1b6a62b204ab4751, cn=KAVITA KETAN TONDE
Date: 2025.03.29 15:27:14 +05'30'

**( कविता तोंडे )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई
६. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक,
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव ( क्रीडा ), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर
११.लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे.

१२.सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा.
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४.संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१५.वित्त विभाग (व्यय-५)/नियोजन विभाग (का. १४७१), मंत्रालय, मुंबई.
१६.अवर सचिव ( अर्थसंकल्प ), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती, क्रीयुसे-३